अंगणवाडी केंद्र इमारत बांधकामासाठी सन २०१८-१९ मध्ये भांडवली लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पित केलेला निधी समर्पित करण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. एबावि-२०१८/प्र.क्र. ४१३/का.६**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- ७ फेब्रुवारी, २०१९

**वाचा :-** महिला व बाल विकास विभाग,शासन निर्णय क्र.एबावि-२०१५/प्र.क्र.२८९/का.६, दिनांक १६ फेब्रुवारी २०१७

**प्रस्तावना :-**

एकात्मिक बाल विकास सेवायोजना हया केंद्रपुरस्कृत योजनेतंर्गत महिला व बाल विकास विभागामार्फत राज्यात अंगणवाडया चालविण्यात येतात. अंगणवाडयांच्या इमारती बांधण्यासाठी दिनांक १५ जानेवारी २०१० च्या शासन निर्णयानुसार आराखडा निश्चित करण्यात आला असून बिगर आदिवासी क्षेत्रासाठी एका अंगणवाडी बांधकामाठी रुपये ६.०० लाख व आदिवासी क्षेत्रासाठी रुपये ६.६० लाख इतका निधी मंजूर करण्यात येत होता. त्यामध्ये दिनांक ११ ऑक्टोबर २०१८ च्या शासन निर्णयान्वये वाढ करुन अंगणवाडी केंद्र इमारती बांधण्यासाठी मंजूर आराखडयानुसार सन २०१८-१९ या वित्तीय वर्षापासून बिगर आदिवासी क्षेत्रासाठी एका अंगणवाडी केंद्र इमारत बांधकामासाठी रुपये ८.५० लाख (GST सह) व आदिवासी क्षेत्रासाठी एका अंगणवाडी केंद्र इमारत बांधकामासाठी रुपये ९.४० लाख (GST सह) इतका निधी मंजूर करण्यात आलेला आहे.

२. नियोजन विभाग,वित्त विभाग व महालेखापाल यांच्या मान्यतेने अंगणवाडी बांधकामासाठी दिनांक १६ फेब्रुवारी २०१७ च्या शासन निर्णयान्वये खालीलप्रमाणे लेखाशिर्ष मंजूर करुन घेण्यात आलेली असून सन २०१८-१९ मध्ये त्याखाली खालीलप्रमाणे निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे.

( रुपये लाखात)

| अ.क्र. | बाब | लेखाशिर्ष | | |
|---|---|---|---|---|
| | | केंद्र ६०% | राज्य ४०% | राज्य १००% |
| १ | अंगणवाडी बांधकाम | ४२३६००४९ ५३-मोठी बांधकामे | ४२३६००५८ ५३-मोठी बांधकामे | ४२३६००६७ ५३-मोठी बांधकामे |
| | सन २०१८-१९ मंजूर निधी | ६०००.०० | ४०००.०० | ०.१ |
| | एकुण | ६०००.०० | ४०००.०० | ०.१ |

३. अंगणवाडी केंद्र बांधकाम करण्याची योजना जिल्हा वार्षिक योजनेमध्ये DPDC मध्ये सुरु असून सदर योजनेच्या नावात बदल करण्याबाबतचा शासन निर्णय दिनांक १५ डिसेंबर २०१७ रोजी निर्गमित करण्यात आलेला आहे. त्यानुसार योजनेच्या नावात बदल करण्याबाबतचा प्रस्ताव नियोजन विभाग, वित्त विभागामार्फत व महालेखापाल कार्यालयास सादर करण्यात आला होता. नियोजन विभागाने अंगणवाडी केंद्र बांधकाम हे महसुली लेखाशिर्षाखाली घेण्याबाबत सूचित केले असून त्यास महालेखापाल कार्यालयाने मंजूरी दिलेली आहे. यास्तव राज्यस्तरावर घेण्यात आलेली उपरोक्त **तीन भांडवली लेखाशिर्ष** रद्द करुन त्याऐवजी खालीलप्रमाणे **तीन नविन महसूली लेखाशिर्ष** घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

| अ.क्र. | बाब | लेखाशिर्ष | | |
|---|---|---|---|---|
| | | केंद्र ६०% | राज्य ४०% | राज्य १००% |
| १ | अंगणवाडी केंद्र इमारत बांधकाम | २२३६...... २७-लहान बांधकामे ३५- भांडवली मत्तेच्या निर्मिती करिता अनुदान | २२३६....... २७-लहान बांधकामे ३५- भांडवली मत्तेच्या निर्मिती करिता अनुदान | २२३६...... २७-लहान बांधकामे ३५- भांडवली मत्तेच्या निर्मिती करिता अनुदान |

**शासन निर्णय** :-

नियोजन व वित्त विभागाशी विचारविनिमय करुन अंगणवाडी केंद्र इमारत बांधकाम करण्यासाठी सन २०१८-२०१९ साठी खालील भांडवली लेखाशिर्षातंर्गत अर्थसंकल्पित केलेला केंद्र व राज्य लेखाशिर्षाखालील **रुपये १००.०० कोटी** निधी समर्पित करण्यास शासन मंजूरी देत आहे.

( रुपये लाखात

| अ.क्र. | बाब | लेखाशिर्ष | | |
|---|---|---|---|---|
| | | केंद्र ६०% | राज्य ४०% | राज्य १००% |
| १ | अंगणवाडी बांधकाम | ४२३६००४९ ५३-मोठी बांधकामे | ४२३६००५८ ५३-मोठी बांधकामे | ४२३६००६७ ५३-मोठी बांधकामे |
| | सन २०१८-१९ मंजूर निधी | ६०००.०० | ४०००.०० | ०.१ |
| | एकुण | ६०००.०० | ४०००.०० | ०.१ |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२०८१७१७४९४३३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a6447 7bf79d694, serialNumber=4ca059ab7b8d64aaf749fe58e0a714a015f521cb28fd2204e49 a4d81f12a5745, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2019.02.08 17:20:31 +05'30'

( ला.रा. गुजर )
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१. अपर मुख्य सचिव ( नियोजन) ,नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई

२. प्रधान सचिव (वित्तीय सुधारणा),वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
३. सचिव, महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
४. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य,नवी मुंबई
५. आयुक्त,महिला व बाल विकास,पुणे
६. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
७. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व परिक्षा), मुंबई / नागपूर
८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
९. कक्ष अधिकारी ( का.४) महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
१०. निवड नस्ती (का-६).